शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून राज्यातील शासन मान्यता प्राप्त व्यवस्थापनशास्त्र पदव्युत्तर पदवी (MBA/MMS) अभ्यासक्रमाच्या अखिल भारतीय उमेदवारी प्रकारामध्ये प्रवेशाकरीता पात्र ठरविण्यात आलेल्या GMAT, MAT, ATMA, व XAT या परीक्षा वगळण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.३६३/तांशि-४.
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १६ मार्च, २०२०

वाचा : संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्रमांक : २अ/एडीएम/२०१९/९०२, दिनांक १२ डिसेंबर,२०१९

प्रस्तावना :

राज्यातील मान्यता प्राप्त MBA/MMS पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या अखिल भारतीय जागांवरील प्रवेशासाठी राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्षाकडून घेण्यात येणा-या MAH-MBA/MMS CET या प्रवेश परीक्षेबरोबरच राष्ट्रीय स्तरावरील आयआयएम (Indian Institute of Management) आणि एनटीए (National Testing Agency) या शासकीय यंत्रणेमार्फत घेण्यात येणारी Common Admissions Test (CAT), Common Management Admission Test (CMAT) या प्रवेश परीक्षा, विविध बिगर शासकीय संस्थांच्या संघटनेच्या वतीने घेण्यात येणा-या Graduate Management Admission Test (GMAT), Xavier Aptitude Test (XAT), Management Aptitude Test (MAT), AIMS Test for Management Admission (ATMA) प्रवेश परीक्षा ग्राहय धरण्यात येत असतात. या परीक्षा घेण्याची वारंवारता, परीक्षा घेणाऱ्या यंत्रणेकडून गुणपत्रिका पडताळणीसाठी Online सुविधा उपलब्ध नसणे, त्यामुळे सुविधा केंद्रांवर व प्रवेश निश्चिती केंद्रावर पडताळणीसाठी येणाऱ्या अडचणी, संस्थास्तरावर प्रवेश निश्चित करीत असताना संशयित गुणपत्रिका आढळल्यास ऐन वेळेस प्रवेश रद्द करावा लागणे, त्यामुळे नामांकित संस्थेतील प्रवेशापासून उमेदवार वंचित राहणे इत्यादी स्वरुपाच्या अडचणी निर्माण होतात. शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये एमबीए / एमएमएस अभ्यासक्रमाकरीता २६ विद्यार्थ्यांनी बनावट / बोगस गुणपत्रिका सादर करुन प्रवेश मिळविला असल्याचे प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या निदर्शनास आले आहे. तसेच शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० मध्ये देखील एमबीए / एमएमएस अभ्यासक्रमासाठी बनावट / बोगस गुणपत्रिका सादर करुन प्रवेश मिळविलेल्या विद्यार्थ्यांविरुध्द पोलिसांमध्ये

एफआयआर दाखल केला आहे. शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मधील विविध पदवी आणि पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी प्रवेश पात्रता व प्रवेश प्रक्रिया नियमावलीचा मसुदा तयार करणे, पूर्वीच्या प्रवेशाबद्दल संस्थांकडून अभिप्राय/सूचना विचारात घेऊन नियमात आवश्यक सुधारणा करणे, विद्यार्थी पात्रतेसंबंधी सर्वसमावेशक निर्णय घेणे इत्यादीबाबत तंत्र शिक्षण संचालनालय स्तरावर गठित केलेल्या समितीने एमबीए / एमएमएस अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता केवळ शासनाची प्रवेश परीक्षा व केंद्रीय स्तरावरील CMAT, CAT या प्रवेश परीक्षा ग्राहय धरण्यात याव्यात, असे सूचविले आहे. त्यासअनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी वर नमूद दिनांक १२/१२/२०१९ च्या पत्राव्दारे सविस्तर अहवाल शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय :**

तंत्र शिक्षण संचालकांच्या अहवालाच्या अनुषंगाने शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून राज्यातील मान्यता प्राप्त व्यवस्थापनशास्त्र पदव्युत्तर पदवी (MBA/MMS) अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता अखिल भारतीय उमेदवारी प्रकारामध्ये GMAT, MAT, ATMA, व XAT या परीक्षा ग्राह्य न धरता केवळ MAH-MBA/MMS CET, CMAT व CAT या प्रवेश परीक्षा ग्राह्य धरण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**२.** त्यानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायीक शैक्षणिक संस्था (पूर्णवेळ व्यावसायिक पदव्युत्तर पदवी तांत्रिक पाठ्यक्रमांच्या प्रवेशांचे विनियमन),नियम २०१७ च्या नियम 10(2) (a) मध्ये प्रथम वर्ष व्यवस्थापनशास्त्र पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या अखिल भारतीय उमेदवारी प्रकारामध्ये GMAT, MAT, ATMA, व XAT या परीक्षा वगळण्याची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१६१३३५४४८००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fcf7172a73579b34fa622983d8fb647780fbef1d35a1ca975955eb9193f3f800, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2020.09.07 14:49:52 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई,

२. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई ४०० ००१
३. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
४. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये
५. सर्व अकृषी विद्यापीठाचे कुलसचिव
६. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
७. सर्व प्रशासनिक विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व सहसचिव/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (तांशि-४)